**केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२५-२६ करिता सर्वसाधारण योजनेतून Kind Grant स्वरूपातील २२१०५२४६ या लेखाशिर्षतून राज्य हिस्सा ४०% प्रमाणे सन २०२५-२६ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून रु.९८२.२९ लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी -१३२५/प्र.क्र.२१४/एनएचएम(संगणक क्र.१०८७४४५)

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २० जून, २०२५

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. D.O. Mo. G.२७०३४/३७/२०१९-२० NHM Finance दि.१३/०६/२०१९

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. D.O. F.No.१ (१३).PFMS/२०२० NHM Finance दि.१६.०२.२०२३

३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०७.०४.२०२५

४) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र. T-१३०२०/०१/२०२२-IMM (००१) दि.२०.०५.२०२५ (रु.१२३०.०६ लक्ष)

५) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र. Y-११०३०/०१/२०१३-CC&V(Pt.II)-Part (I)-०१० दि.२१.०५.२०२५ (रु.१६३.६४ लक्ष)

६) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र. T-१३०२०/०२/२०२५-IMM (०१९) दि.२९.०५.२०२५ (रु.७९.७४ लक्ष)

७) संचालक (वित्त व लेखा) यांच्या प्रस्ताव क्र.राआसोम/एफएमजी/Kind राहि/२६५४४-५५१/२०२५-२६, दिनांक १३/०६/२०२५

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले आहे. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास “राष्ट्रीय आरोग्य अभियान” असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग

नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत असलेल्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानातंर्गत लेखाशिर्ष २२१०५२४६ अंतर्गत सर्वसाधारण घटकाकारिता Kind Grant साठी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकारीता ४० टक्के राज्य हिश्श्यासाठी शासनाने राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात लेखाशिर्ष २२१०५२४६ बाब ३१ अंतर्गत रु.७००००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. तरी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी वितरीत केंद्र हिश्श्याचा समरुप राज्य हिश्श्याचा रु.९८२.२९ लक्ष इतका निधी राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

सन २०२५-२६ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीचा तपशील खालीलप्रमाणे:-

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशील | (राज्य) |
|---|---|---|
| | | २२१०५२४६ |
| A | सन २०२५२-६ करिता अर्थसंकल्पीय अंदाज | ७००००.०० |
| B | शासन निर्णय निर्गमित | |
| १ | बियुडी -१३२५/प्र.क्र.२१४/एनएचएम (संगणक क्र.१०८७४४५) दि.१०.०६.२५ | ३६०.८० |
| C | उपलब्ध तरतूद एकूण (A-B) | ६९६३९.२० |

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सर्वसाधारण घटकाकरिता Kind Grant स्वरूपातील सन २०२५-२६ च्या अर्थसकंल्पीय तरतूदीमधून राज्य हिश्श्याचे लेखाशिर्ष २२१०५२४६ , ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत रू.९८२.२९ लक्ष इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

(रु. लाखात)

| अ.क्र | तपशिल | राज्य हिस्सा | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | सन २०२५-२६ ची अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत करावयाची रक्कम |
| १ | आर-१ २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ सार्वजनिक आरोग्य, ८०० इतर खर्च, सर्वसाधारण योजना (०१) (१५) राष्ट्रीय | २२१०५२४६ | ७००००.०० | ९८२.२९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | ग्रामीण आरोग्य अभियान, केंद्र पुरस्कृत योजना, (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर ) | | | |

०२. सदरचा खर्च वर तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे संबंधित लेखाशीर्षांखालील २०२५-२६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

०३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करावी, यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. वित्त विभागाच्या दिनांक ०७/०४/२०२५ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ०७/०४/२०२५ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनाक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

०५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे राज्य आरोग्य सोसायटीने प्रमाणित केलेले आहे.

०६. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या/लाभार्थ्याच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

०७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०७ एप्रिल, २०२५ च्या

शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन करुन त्या संदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबीं स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहून निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

०८. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

०९. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात योणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

१०. सदर प्रस्तावावरील निधीच्या विनियोगाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीच्या संदर्भांत शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

११. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०७/०४/२०२५ च्या परिपत्रकातील तरतूदीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६२०१०१२०२७०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL SAWARE

Digitally signed by ANIL SAWARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=073348b7a8767f0f7865422df1e65ce2f3bcdf6786e4712e2c088a9ac4ffee3f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1C7875BFBCCDB94828A5028954F06ED28EC75FD43053DB3AE8254FA5A5D14A57, cn=ANIL SAWARE
Date: 2025.06.20 13:13:38 +05'30'

**( अनिल वि. सावरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.

२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
६. सहाय्यक संचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभाग (अर्थसंकल्प/ विद्ययो), मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अर्थसंकल्प व लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
१३.निवडनस्ती (एनएचएम) .